राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या अतिरिक्त निधीची गुंतवणुकी संदर्भातील सुधारित मार्गदर्शक तत्वे /सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शासाउ-१०.१५/प्र.क्र.४२/सा.उ.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

**तारीख: २७/१०/२०१५**

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः संकीर्ण-१०.०५/प्र.क्र.१३/अर्थोपाय, दि. २६/४/२००५**

२) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः शासाउ-१०.०५/प्र.क्र.२६/सा.उ., दि. १३/३/२००६**

३) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः शासाउ-१०.०५/प्र.क्र.२६/सा.उ., दि. २२/३/२००६**

४) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः शासाउ-१०.१०/प्र.क्र.४/सा.उ., दि. १/७/२०१०.**

५) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः शासाउ-१०.१४/प्र.क्र.१७/सा.उ., दि. २४/७/२०१४.**

**प्रस्तावना :-**

राज्य सार्वजनिक उपक्रमांनी त्यांचेकडे शिल्लक असलेला अखर्चित निधी गुंतविण्यासंदर्भात उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक (२), (३) व (४) येथील शासन निर्णयान्वये मार्गदर्शक तत्वे विहित केली आहेत. तसेच संदर्भाधिन क्रमांक (५) येथील परिपत्रकान्वये बँकेमध्ये निधी गुंतविताना त्याच्या सुरक्षिततेसाठी घ्यावयाच्या दक्षतेबाबत आवश्यक अशा सूचना देण्यात आल्या आहेत.

२. दरम्यान नजिकच्या काळात काही महामंडळांकडून त्यांच्याकडे शिल्लक असलेला निधी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राष्ट्रीयकृत बँकेत मुदत ठेवींच्या स्वरुपात ठेवण्यात आला होता. तथापी, सदर निधी गुंतविल्यानंतर गुंतवणूक प्रमाणपत्र प्राप्त करणे, ते योग्य असल्याचे खात्री करणे, त्याच्या सद्य:स्थितीबाबत नियमितपणे आढावा घेणे इ. बाबत गुंतवणूक प्रक्रीयेत त्रुटी राहील्या. तसेच या गुंतवणूकीमध्ये गैरव्यवहार झाला असल्याचे आर्थिक गुन्हे अन्वेषण,मुंबई यांनी कळविले. त्याचप्रमाणे अपर पोलीस आयुक्त, मुंबई यांनी माहे मार्च, २०१५ मध्ये सदर आर्थिक गैरव्यवहाराबाबतच्या गुन्ह्याची कार्यपध्दती (Modus Operandi) शासनाच्या निदर्शनास आणुन दिली आहे. त्यामुळे शासनाचा निधी योग्य पध्दतीने गुंतविला जावा या पार्श्वभूमिवर उपरोक्त मार्गदर्शक तत्वे व सूचना संकलित करुन सर्व समावेशक असा एकत्रितपणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेमध्ये विहित केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक (२) ते (५) येथील शासन निर्णय/परिपत्रक अधिक्रमित करुन राज्य सार्वजनिक उपक्रमांच्या अतिरिक्त निधीच्या गुंतवणूकीसंदर्भातील खालीलप्रमाणे सुधारीत मार्गदर्शक तत्वे व सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

### मार्गदर्शक तत्वे व सुचना:-

**(अ) गुंतवणूकीचा निर्णय घेण्याचे धोरण व दुरदर्शी निकष :-**

(i) निधी गुंतवणूकीचे निर्णय हे सुयोग्य/सुरक्षित अशा व्यावसायिक अंदाजावर/विवेचकबुध्दीवर आधारीत असावेत. अतिरिक्त निधीच्या उपलब्धतेची परिगणना ही अंदाजपत्रकावर आधारीत असावी. या अंदाजपत्रकामध्ये खेळत्या भांडवलाची गरज, मत्तेचे पुन:स्थापन आणि आगामी खर्चाच्या मागण्या इ. बाबींचा विचार करण्यांत यावा.

(ii) तसेच अतिरिक्त निधी उपलब्धततेची परिगणना किमान १ वर्षाच्या कालावधीकरीता करण्यात यावी आणि कमाल ३ वर्षापर्यंत अतिरिक्त निधी मुदत ठेव स्वरुपात गुंतविण्यांत यावा.

(iii) गुंतवणुकीच्या माध्यमातून प्राप्त उत्पन्नावर कोणतीही अटकळीची तत्वे/दृष्टीकोन असू नये.

(iv) अतिरिक्त निधी गुंतविण्याबाबत कोणताही निर्णय घेण्यापूर्वी योग्य असे व्यावसायिक मूल्यमापन करण्यांत यावे. ह्या शासन निर्णयाव्दारे मान्य करण्यात आलेल्या वित्तीय संस्थेतच गुंतवणूक करण्यात यावी.

(v) सार्वजनिक उपक्रमांनी अतिरिक्त निधी फक्त विशिष्ट व्याजदर प्राप्त होण्याच्या दृष्टीने, विशिष्ट कालावधासाठी गुंतवू नये. कारण सार्वजनिक उपक्रमांना स्वत:च्या गरजेसाठी, समान किंवा जास्त व्याजदराने कर्ज घेण्याच्या मार्गाचा अवलंब / उपाय करावा लागतो.

(vi) बँकेच्या नक्तमुल्याच्या १५% पेक्षा अधिक निधी एका बँकेत गुंतवू नये.

**(ब) गुंतवणूकीचा निर्णय घेण्याचा अधिकार :-**

(i) सार्वजनिक उपक्रमाने सर्व गुंतवणूकीचा निर्णय हा उपक्रमांस लागू असलेला कंपनी कायदा, शासनाच्या सूचना व इतर लागू असलेल्या संबधित वैधानिक नियमातील तरतुदीनुसार असल्याची खात्री करावी. जर कोणतीही गुंतवणूक यापूर्वी केलेली असेल आणि जी वरील मार्गदर्शक तत्वांशी सुसंगत नसेल, तर अशी गुंतवणूक परिपक्व (Matured) झाल्यानंतर तीचे नवीकरण (Renewal) करण्यात येऊ नये.

(ii) उपक्रमाच्या संस्थापन व कार्य नियमावलीप्रमाणे निधी गुंतविण्याचे अधिकार सर्वसाधारणपणे उपक्रमाच्या संचालक मंडळाला असतात. म्हणून, सामान्यत: अतिरिक्त

निधी गुंतविण्याचा निर्णय उपक्रमाच्या संचालक मंडळाने घ्यावा. जर अधिकार प्रदान करणे आवश्यक असतील तेव्हा संचालक मंडळाने त्यांचे हे अधिकार इतरांना प्रदान करताना एकापेक्षा जास्तवेळा असे अधिकार प्रदान (Sub-Delegation) करु नयेत.

(iii) अतिरिक्त निधी गुंतवणूकीच्या निर्णयाचे अधिकार ठराविक रक्कमेसाठी, उपक्रमाचे व्यवस्थापकीय संचालक व संचालक (वित्त) अथवा वित्त प्रमुख अंतर्भूत असलेल्या कार्यकारी गटाला / समितीला प्रदान करण्याचा निर्णय संचालक मंडळ घेऊ शकते. असे अधिकार प्रदान केले असल्यास, अशा संबंधित आदेशामध्ये मंजूरीचा स्तर आणि प्रत्येक अधिका-याचा अधिकार याचे विश्लेषण करण्यांत यावे व त्यांचे न चुकता पालन करण्यात यावे. सर्व प्रकरणी अशा अधिकाराचे वाटप करताना संचालक मंडळाच्या पुढील बैठकीत स्वयंचलित अंतर्गत अहवाल सादर करण्यासाठी योग्य अशी यंत्रणा असावी.

(iv) कोणत्याही परिस्थितीत कोणतीही एजन्सी अथवा एजन्टमार्फत उपक्रमाचा निधी गुंतविण्यात येऊ नये.

**(क) गुंतवणूकीसाठी बँक व वित्तीय संस्थेची निवड :-**

या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांचे पालन करण्याच्या अटीच्या अधिन राहून खालील एक किंवा त्यापेक्षा जास्त बँक अथवा इतर वित्तीय संस्थांमध्ये राज्य सार्वजनिक उपक्रमांना अतिरिक्त निधी गुंतविता येईल.:-

i) शेड्युल बँकेपैकी स्टेट बँक व त्याची असोसिएट बँक, राष्ट्रीयकृत बँक व किमान ४००० कोटी नक्त मत्ता (Net Worth) असलेली बँक,

ii) वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक २६ एप्रिल, २००५ मध्ये नमूद केलेल्या अटी / शर्तीनुसार महाराष्ट्र शासनाकडे थेट गुंतवणूक,

iii) प्रशासकीय विभागाच्या सहमतीने भारत सरकार आणि महाराष्ट्र शासन यांच्या कोषागारातील देयके/रोखे,

**(ड) <u>निधी गुंतविण्याची कार्यपध्दती / प्रक्रिया :-</u>**

a. निधींची गुंतवणूक शक्यतो इलेक्ट्रॉनिकली व ऑनलाईन पध्दतीने करावी. गुंतवणूक ऑनलाईन पध्दतीने करणे शक्य नसल्यास, याबाबतची प्रक्रीया मुख्य लेखा व वित्त अधिकारी किंवा सर्वात ज्येष्ठ लेखा व वित्त अधिकारी यांच्या स्वाक्षरीने करावी. बँकेकडून किंवा इतर वित्तीय संस्थांकडून निधी ठेवीसंदर्भातील मूळ पावत्या / प्रमाणपत्रे कागदपत्र स्वरुपात प्राप्त कराव्यात आणि योग्य असल्याची खात्री करावी.

b. वरील अधिका-यांनी ठेवीच्या पावत्या / प्रमाणपत्रांवर संबंधित बँकेचे अथवा वित्तीय संस्थेचे सील व बँकेच्या / वित्तीय संस्थेच्या अधिका-याची स्वाक्षरी योग्य असल्याची तपासणी करुन खातरजमा करावी व तशी नोंद करावी.

c. कोणत्याही परिस्थितीत कोणतीही एजन्सी अथवा एजन्टमार्फत उपक्रमाचा निधी गुंतविण्यात येऊ नये.

d. बँकेत अथवा इतर वित्तीय संस्थेत ठेव स्वरुपात किंवा इतर स्वरुपात निधी गुंतविला असेल तर त्याची मूळ पावती / प्रमाणपत्रे उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालक / मुख्य कार्यकारी अधिकारी अथवा मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांच्या अभिरक्षेमध्ये (Custody) ठेवण्यात यावीत. शक्य असल्यास अशी प्रमाणपत्रे सेफ डिपॉझीट लॉकरमध्ये ठेवण्यात यावीत.

e. या ठेवीसंदर्भात उक्त अधिका-यांनी वेगळ्या रजिस्टर मध्ये नोंद घ्यावी व याकरीता एक स्वतंत्र लॉगबुक ठेवावे. या लॉगबुक मध्ये नियमितपणे नोंदी करुन वरील अधिका-यांनी सह्या कराव्यात.

f. बँकेत अथवा इतर वित्तीय संस्थांमध्ये गुंतविलेल्या निधीची आवश्यक ती तपासणी २-३ महिन्याच्या कालांतराने प्रत्यक्ष बँकेत अथवा वित्तीय संस्थेमध्ये जाऊन नियमित स्वरुपात संबंधित अधिका-यांनी स्वत: करावी, याबाबतची जबाबदारी सर्वस्वी त्यांची राहील. आवश्यक तो "शिल्लक दृढीकरण" (Balance confirmation) दर तीन महिन्याने करण्यात यावे.

g. सर्व उपक्रमांनी बँकेला अथवा इतर वित्तीय संस्थांना अशा लेखी सूचना द्याव्यात की, उपक्रमाच्या बँक अथवा वित्तीय संस्थेमधील ठेवीच्या अनुषंगाने उपक्रमाकडून अथवा इतर कोणाकडूनही ठेवी यांचेवर अधिकर्ष (Overdraft) / कर्ज (Loan) अशा प्रकारच्या कॅश क्रेडीटची मागणी बँकेला किंवा इतर वित्तीय संस्थांना प्राप्त झाली तर त्याबाबत उपक्रमाशी प्रत्यक्ष संपर्क साधून लेखी खातरजमा केल्याशिवाय कोणतीही कार्यवाही करण्यात येऊ नये अथवा ओव्हरड्राफ्ट/कॅश-क्रेडीट देण्यात येऊ नये. तसेच सार्वजनिक उपक्रमांनी जर ठेवीवर ओव्हरड्राफ्ट किंवा कर्ज / कॅश-क्रेडीट घ्यावयाचे असेल तर संचालक मंडळाची मान्यता घ्यावी.

h. बँकेमध्ये अथवा इतर वित्तीय संस्थांमध्ये गुंतविलेल्या निधीच्या मूळ प्रमाणपत्राची, बँकेच्या कार्यालयीन प्रतीशी प्रत्यक्ष बँकेत किंवा संस्थेत जाऊन पडताळणी वेळोवेळी करावी व हे काम मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी स्वत: किंवा त्यांच्यापेक्षा एक दर्जा कमी असलेल्या अधिका-यांनी करावे. या पेक्षा कनिष्ठ अधिका-यांकडे हे काम सोपविण्यात येऊ नये.

i. गुंतवणूक प्रमाणपत्र थेट बँकेकडून अथवा वित्तीय संस्थांकडून प्राप्त करुन घेण्यात यावे. तसेच निधी काढताना अथवा पुनर्गुंतवणूकीसाठीच मुळ प्रमाणपत्र सादर करावे.

j. मुदत ठेवीवर अधिकर्ष (Overdraft) घेण्याचे टाळण्यात यावे. परंतु अपरिहार्य परिस्थितीत अधिकर्ष (Overdraft) घ्यावयाचा असल्यास संचालक मंडळाच्या मान्यतेशिवाय घेण्यात येऊ नये. तसेच अधिकर्ष खाते (Overdraft A/C) इलेक्ट्रॉनिकली पाहण्याचा अधिकार प्राप्त (Viewing Rights) करुन घेण्यात यावा.

k. वरीलपैकी ज्या बँकेशी अथवा वित्तीय संस्थेशी सदर व्यवहार करण्यात येणार आहे त्यांना स्वाक्षरीचे अधिकार असलेल्या व्यक्तीबाबत संचालक मंडळ मान्य, उपक्रमाची धोरणाची प्रत, लेखी स्वरुपात देण्यात यावी.

**(इ) उपक्रम व प्रशासकीय विभागांनी घ्यावयाची दक्षता व संनियंत्रणाची कार्यवाही :-**

i) उपक्रमांचा त्यांचेकडील निधी या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वानुसारच गुंतविण्यात यावा.

ii) प्रत्येक उपक्रमाने वरील मार्गदर्शक सूचना/तत्वे संचालक मंडळाच्या पुढील बैठकीत अवलोकनार्थ सादर करावीत आणि त्याची काटेकोरपणे पालन/अंमलबजावणी होत आहे याची खातरजमा करावी.

iii) उपक्रमांनी त्यांचेकडील एकूण निधी बँकेत वा इतर ठिकाणी गुंतविलेला निधी व त्यावर प्राप्त झालेले व्याज याचा त्रैमासिक अहवाल प्रशासकीय विभागाकडे सादर करावा.

iv) प्रशासकीय विभागाने देखील त्यांच्या अखत्यारीतील उपक्रमाच्या किंवा इतर प्रयोजनासाठी ठेवलेल्या संपूर्ण निधीचा नियमितपणे आढावा घ्यावा व तपासणी करावी. याबाबतचा त्रैमासिक अहवाल उपक्रमाने संबंधित प्रशासकीय विभाग प्रमुखाकडे न चुकता सादर करावा.

v) संबंधित प्रशासकीय विभागांना विनंती आहे की, सदर मार्गदर्शक सूचना/तत्वे त्यांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व सार्वजनिक उपक्रमांच्या निदर्शनास आणाव्यात.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२६१५४९०९२१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KUMAR BIJAY

Digitally signed by KUMAR BIJAY
DN: c=IN, o=FOOD CORPORATION OF INDIA, ou=FCI HQ NEW DELHI, postalCode=110001, st=DELHI, cn=KUMAR BIJAY
Date: 2015.10.27 13:26:01 +05'30'

**( विजय कुमार )**
प्रधान सचिव, वित्त विभाग

**प्रति,**

- प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
- महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
४. सर्व विधान मंडळ सदस्य
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक,
६. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अप्पर मुख्य /प्रधान सचिव/सचिव सचिव
७. सर्व सार्वजनिक उपक्रमाचे व्यवस्थापकीय संचालक / मुख्य कार्यकारी अधिकारी,
८. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग
९. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
    - प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
    - प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
    - प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
    - प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
    - सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
    - प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय मादाम कामा रोड, मुंबई
    - प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४०० ०५१
    - विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली .
१२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१३. बहूजन समाजपार्टी, डी-१, इन्साहटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
१४. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ. बॅरॅकनं.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२०,
१५. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई-४०० ००४

१६.भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोबमिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३

१७.इंडियन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेय (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००० २

१८. नॅशनलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री पेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.

१९.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,

२०.महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, दादर, मुंबई

२१.वित्त विभागातील सर्व कार्यासने

२२.निवडनस्ती, सार्वजनिक उपक्रम, वित्त विभाग

- पत्राव्दारे.